शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्यासाठी
बिंदू नामावलीचा वापर...........................

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय क्र. शानिवा-२५९९/प्र.क्र.४२/९९/२३-अ.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ६ मार्च, १९९९.

वाचा:
1) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शानिवा २५८७/(प्र.क्र.९१/८५)/२३-अ. दिनांक-१२ जून, १९८६
2) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शानिवा २५८६/(प्र.क्र.८८/८७)/२३-अ. दिनांक-१ एप्रिल, १९८९
3) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शानिवा १५८७/(प्र.क्र.२४३)/२३-अ. दिनांक-९ ऑक्टोबर, १९९०
4) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी १०९३/२१०७/प्र.क्र.१४१/९३/१६-ब. दिनांक-१८ जून, १९९४
5) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.शानिवा २५९४/प्र.क्र.६४३/९४/२३-अ. दिनांक-२५ ऑगस्ट, १९९४
6) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी १०९७/प्र.क्र.२/९७/१६-ब. दिनांक २९ मार्च, १९९७.

प्रस्तावना:-

बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थानाचे वाटप करण्यासाठी बदलीपात्र, बृहन्मुंबई बाहेरून बृहन्मुंबईत नियुक्त झालेल्या, तसेच शासन परिपत्रक, दि. १२ जून, १९८६ अन्वये वैद्यकीय व इतर कारणाने पात्र असलेल्या शासकीय अधिकारी/कर्मचारी यांच्या बाबतीत सरळ सेवा भरतीसाठी असलेल्या २०० बिंदू नामावलीच्या आधारे शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.शानिवा २५९४/प्र.क्र.६४३/९४/२३-अ. दिनांक २५ ऑगस्ट, १९९४ अन्वये आरक्षण बिंदू नामावली तयार करण्यात आली होती.

मंडल आयोगाच्या शिफारशीनुसार इतर मागासवर्गीयांना शासकीय निमशासकीय सेवेत आरक्षण विहित करण्यात आले आहे. त्यानुसार शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-१०९७/प्र.क्र.२/९७/१६-ब. दिनांक २९.३.१९९७ नुसार सरळ सेवा भरतीसाठी १०० बिंदू नामावली तयार करण्यात आली. सदर नामावलीच्या आधारे शासकीय निवासस्थानांचा वाटपासाठी १०० बिंदू नामावली तयार करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

निर्णय:-याबाबत शासनाने असा निर्णय घेतला आहे की, शासकीय निवासस्थानाचे वाटप करताना:-

१. शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी १०९७/ प्र.क्र.२/९७/१६-ब. दिनांक २९ मार्च, १९९७, अन्वये निर्गमित केलेल्या १०० बिंदू नामावली मधील ५२ बिंदू मागासवर्गीयांसाठी आरक्षित केलेले असून ४८ बिंदू खुल्या वर्गासाठी आरक्षित केलेले आहेत.

२. मागासवर्गीयांसाठी आरक्षित केलेल्या ५२ बिंदूतील ३५ बिंदू हे बदलीपात्र व बृहन्मुंबई ठाणे व नवी मुंबई या जिल्ह्याच्या क्षेत्राच्या बाहेरून सेवेसाठी आले त्या अधिकारी/कर्मचारी यांची स्वतःच्या/कुटुंबियांच्या नांवे मुंबई/नवी मुंबई तसेच लोहमार्गावरील विरार पर्यन्त व मध्य लोहमार्गावरील कर्जत/कसारा पर्यन्त (जेथून कर्मचारी रोज मुंबईतील कार्यालयांत ये-जा करु शकतात/करतात.) सदनिका नाहीत, अशांना निवासस्थानाचे वाटप करण्यासाठी वापरण्यात यावेत.

३. खुल्या प्रवर्गासाठी आरक्षित केलेल्या ४८ बिंदूतील ३२ बिंदू हे बदलीपात्र व बृहन्मुंबई, ठाणे व नवी मुंबई या जिल्ह्याच्या क्षेत्राच्या बाहेरून सेवेसाठी आले त्या अधिकारी/कर्मचारी यांची स्वतःच्या/कुटुंबियांच्या नांवे मुंबई/नवी मुंबई तसेच लोहमार्गावरील विरार पर्यन्त व मध्य लोहमार्गावरील कर्जत/कसारा पर्यन्त (जेथून कर्मचारी रोज मुंबईतील कार्यालयांत ये-जा करु शकतात/करतात.) सदनिका नाहीत, अशांना निवासस्थानाचे वाटप करण्यासाठी वापरण्यात यावेत.

४. मागासवर्गीयांसाठी आरक्षित केलेल्या ५२ बिंदू पैकी १७ बिंदू तसेच खुल्या प्रवर्गासाठी आरक्षित केलेल्या ४८ बिंदू पैकी १६ बिंदू हे त्या त्या प्रवर्गात टक्केवारी नुसार व शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र. शानिवा-२५८५/प्र.क्र.९१/८५/२३-अ. दि.१२.६.८६ अन्वये विहित केल्यानुसार खालील अधिकारी/कर्मचारी यांना वाटप करण्यात यावेत.

१. अधिकारी/कर्मचारी अथवा त्यांचे कुटुंबिय हृदय किंवा कर्करोगाने पिडित असल्यास.
२. अधिकारी/कर्मचारी स्वतः माजी सैनिक असल्यास.
३. अधिकारी/कर्मचारी स्वातंत्र्य सैनिकांच्या कुटुंबिय असल्यास.
४. महिला अधिकारी/कर्मचारी प्रशासकीय कारणावरून मुंबई बाहेरून बदली होऊन आली असल्यास.

खुल्या वर्गातील वर परिच्छेद ४ मध्ये दर्शविलेल्या १६ बिंदू पैकी ३ बिंदू हे मागासवर्गीय / खुल्या प्रवर्गातील जे अधिकारी/कर्मचारी स्वतः अपंग (अस्थिव्यंग/मुकबधिर/अंध ) असल्यास वाटप करण्यात येतील.

वरील प्रमाणे १०० बिंदू नामावली सोबत ( परिशिष्ट – 'अ' ) जोडली आहे.

५. वरील आरक्षण बिंदू नामावलीचा वापर करताना अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गातील उमेदवार उपलब्ध नसल्यास या दोन प्रवर्गातील आरक्षण अंतर्गत परिवर्तनीय राहील. तसेच विमुक्त जाती/ भटक्या जमाती करीता 'अ'. 'ब'. 'क' व 'ड' या प्रवर्गातील आरक्षण अंतर्गत परीवर्तनीय राहिल.

६. ज्या ठिकाणी एकाकी बिंदू आहेत. त्या ठिकाणी आलटून पालटून प्राधान्याने निवासस्थानाचे वाटप करावे.

७. निवासस्थानाचे वाटप बिंदू नामावलीनुसारच करण्यात येईल.

८. मंत्रालयातील सर्व विभाग व बृहन्मुंबईतील विभाग व कार्यालय प्रमुख यांनी कृपया या निर्णयातील तरतूदी आणि सूचना त्यांच्या अधिपत्या खालील अधिकारी व कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून द्याव्यात.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र.म.देवभानकर )
उप सचिव. महाराष्ट्र शासन.

प्रति.

राज्यपालांचे सचिव.
मुख्यमंत्र्यांचे सचिव.
सर्व मंत्री/राज्यमंत्री.
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
* प्रबंधक. मूळ न्याय शाखा. उच्च न्यायालय. मुंबई.
* प्रबंधक. अपील शाखा. उच्च न्यायालय. मुंबई.
* प्रबंधक. लोकआयुक्त व उपलोकायुक्त कार्यालय. मुंबई.
* सचिव. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय. विधान भवन. मुंबई.
* सचिव. महाराष्ट्र लोकसेवा आयोग. मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील विभाग व कार्यालयीन प्रमुख.
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
निवड नस्ती.
* ( पत्राने )

एच-।394(500-3-99)।अ

# परिशिष्ट 'अ'

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.शानिवा–२५९९/प्र.क्र.४२/९९/१३–अ,
दिनांक :– ६ मार्च, १९९९ चे सहपत्र.

| अनुक्रमांक | वर्ग | अनुक्रमांक | वर्ग |
|---|---|---|---|
| १ | अनुसूचीत जाती | ३६ | खुला |
| २ | अनुसूचीत जमाती | ३७ | अनुसूचीत जाती |
| ३ | विमुक्त जाती (अ) | ३८ | खुला |
| ४ | भटक्या जमाती (ब) प्राधान्य | ३९ | इतर मागास वर्ग |
| ५ | इतर मागास वर्ग | ४० | खुला प्राधान्य |
| ६ | खुला | ४१ | विमुक्त जाती (अ) प्राधान्य |
| ७ | भटक्या जमाती (क) | ४२ | खुला |
| ८ | खुला | ४३ | अनुसूचीत जाती |
| ९ | इतर मागास वर्ग | ४४ | खुला |
| १० | खुला प्राधान्य | ४५ | इतर मागास वर्ग |
| ११ | भटक्या जमाती (ड) प्राधान्य | ४६ | खुला प्राधान्य |
| १२ | अनुसूचीत जाती | ४७ | भटक्या जमाती (ब) |
| १३ | खुला | ४८ | खुला |
| १४ | खुला | ४९ | इतर मागास वर्ग |
| १५ | विशेष मागास वर्ग प्राधान्य | ५० | खुला |
| १६ | खुला प्राधान्य | ५१ | अनुसूचीत जाती |
| १७ | इतर मागास वर्ग प्राधान्य | ५२ | खुला प्राधान्य |
| १८ | खुला | ५३ | अनुसूचीत जमाती |
| १९ | इतर मागास वर्ग | ५४ | खुला |
| २० | खुला | ५५ | इतर मागास वर्ग प्राधान्य |
| २१ | अनुसूचीत जाती | ५६ | खुला |
| २२ | खुला प्राधान्य | ५७ | भटक्या जमाती (क) प्राधान्य |
| २३ | अनुसूचीत जमाती | ५८ | खुला प्राधान्य |
| २४ | खुला | ५९ | इतर मागास वर्ग |
| २५ | इतर मागास वर्ग | ६० | खुला |
| २६ | खुला | ६१ | अनुसूचीत जाती प्राधान्य |
| २७ | अनुसूचीत जाती प्राधान्य | ६२ | खुला |
| २८ | खुला प्राधान्य | ६३ | अनुसूचीत जमाती |
| २९ | इतर मागास वर्ग | ६४ | खुला प्राधान्य (अपंग) |
| ३० | खुला | ६५ | इतर मागास वर्ग |
| ३१ | भटक्या जमाती (क) प्राधान्य | ६६ | खुला |
| ३२ | खुला | ६७ | अनुसूचीत जाती |
| ३३ | अनुसूचीत जमाती प्राधान्य | ६८ | खुला |
| ३४ | खुला प्राधान्य (अपंग) | ६९ | इतर मागास वर्ग |
| ३५ | इतर मागास वर्ग प्राधान्य | ७० | खुला प्राधान्य |

( कृ.गा.प.)

एच-1394(500-3-99)2

| | | | |
|---|---|---|---|
| ७१ | अनुसूचीत जमाती | ८६ | खुला |
| ७२ | खुला | ८७ | विशेष मागास वर्ग |
| ७३ | अनुसूचीत जाती | ८८ | खुला प्राधान्य |
| ७४ | खुला | ८९ | इतर मागास वर्ग |
| ७५ | इतर मागास वर्ग प्राधान्य | ९० | खुला |
| ७६ | खुला प्राधान्य | ९१ | अनुसूचीत जाती प्राधान्य |
| ७७ | भटक्या जमाती (ड) | ९२ | खुला |
| ७८ | खुला | ९३ | अनुसूचीत जमाती प्राधान्य |
| ७९ | इतर मागास वर्ग | ९४ | खुला प्राधान्य (अपंग) |
| ८० | खुला | ९५ | इतर मागास वर्ग प्राधान्य |
| ८१ | अनुसूचीत जाती | ९६ | खुला |
| ८२ | खुला प्राधान्य | ९७ | अनुसूचीत जाती |
| ८३ | विमुक्त जाती (अ) | ९८ | खुला |
| ८४ | खुला | ९९ | भटक्या जमाती (ब/क) प्राधान्य |
| ८५ | इतर मागास वर्ग | १०० | खुला प्राधान्य |

---